**सैनिक सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद येथे प्रवेश देण्यात आलेल्या विद्यार्थ्यांकडून भोजन व निवास व्यवस्थेसाठी घेण्यात येणाऱ्या रकमेत वाढ करणे तसेच शासनातर्फे प्रत्येक विद्यार्थ्यांमागे देण्यात येणाऱ्या भोजन आकारातील सवलतीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीआय-२०१६/प्र. क्र. २१२ /२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १६.०२.२०१७.

<u>वाचा</u>

१) शासन निर्णय, क्र.एसपीआय २०१३/प्र.क्र. २१२/२८, दि. ०१/०७/२०१४.
२) शासन निर्णय क्र. एसपीआय २०१३/ (प्र.क्र.३४२/१३)२८, दि.११/१२/२०१४.
३) शासन निर्णय क्र. एसपीआय २०१५/१७०/ प.क्र. ७४/१५/२८, दि. २६/०३/२०१५.
४) संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद यांचे पत्र क्र. २०१२/ एसपीआय-२ / ११४७, दिनांक ०७/०७/२०१६.

<u>**प्रस्तावना-**</u>

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या संस्थेत इयत्ता ११ वी व १२ वी अशा दोन शैक्षिणक वर्षात त्यांच्या नियमित आभ्यासक्रमाव्यतिरिक्त राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनी, पुणे (NDA) मधील प्रवेश सुलभ व्हावा या दृष्टीकोनातून UPSC परिक्षा व SSB मुलाखत, तसेच विविध मैदानी खेळ यांचे सर्वांगीण प्रशिक्षण देण्यात येते. त्या दरम्यान त्यांना सकस आहार /नाश्ता पुरविला जातो.या व्यवस्थेपोटी दिनांक २६/०३/२०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रति विद्यार्थ्यी प्रति महिना रु. ३५००/- (तीन हजार पाचशे फक्त) आकारले जातात.त्यामध्ये शासनातर्फे दिल्या जाणाऱ्या रु. १५००/- (एक हजार पाचशे फक्त) चा समावेश आहे. परंतु वाढत्या महागाईच्या पार्श्वभूमीवर सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद यांचेवरील तसेच परिणामी विद्यार्थ्यांच्या पालकांकडून घेण्यात येणाऱ्या भोजन व निवास व्यवस्था शुल्क दरात व शासनातर्फे दिल्या जाणाऱ्या सवलतीच्या दरात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तद्नुसार शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे : -

<u>**शासन निर्णयः-**</u>

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या संस्थेत प्रवेश घेतलेल्या प्रत्येक विद्यार्थ्यांच्या पालकांकडून घेण्यात येणारी जी दरमहा रुपये २०००/-(दोन हजार फक्त) इतका भोजन व निवास व्यवस्था आकार घेण्यात येत होता, ती रुपये १०००/- ने वाढवून एकूण रुपये ३०००/- (रुपये तीन हजार फक्त) इतकी घेण्यात यावी. तसेच प्रत्येक विद्यार्थ्यामागे शासनातर्फे जी दरमहा रुपये १५००/- (एक हजार पाचशे फक्त) इतकी सवलत देण्यात येत होती. ती दरमहा रुपये ५००/- नी वाढवून एकूण रुपये २०००/- ( दोन हजार फक्त) दरमहा देण्यात यावी. संदर्भाधिन दिनांक २६/०३/२०१५ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट ”अ” व “ब” मधील निकषांची अंमलबजावणी पुढे सुरु राहील.

२. शासनातर्फे प्रत्येक विद्यार्थ्यामागे देण्यात येणाऱ्या भोजन आकारातील सवलतीवर दरमहा एकूण रुपये २०००/- (रुपये दोन हजार फक्त) प्रमाणे खर्च मागणी क्र. ए-५, "लेखाशीर्ष २२३५- सामाजिक सुरक्षा व

कल्याण, २०० इतर कार्यक्रम (००) (५) सेवापूर्व अध्ययन संस्था (२२३५ ००७१), ३४- शिष्यवृत्या/विद्यावेतने" याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८२०/१६, दिनांक२९/१२/२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०१७०२१८१४४२३६७८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावने,

Kishor Mahadeo Jakate

Digitally signed by Kishor Mahadeo Jakate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00b70645b34ddd8d92842418782eb54a6897ffe96f4da14db285f027cafa55d1, cn=Kishor Mahadeo Jakate
Date: 2017.02.18 14:45:10 +05'30'

**( कि. म. जकाते )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. मंत्री( मासैक) यांचे स्वीय सहाय्यक,
४) मा.राज्यमंत्री (मासैक) यांचे स्वीय सहाय्यक ,
५) सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७) महालेखापाल (लेखा व आुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
८) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई § ४०० ०३२,
९) कुलगुरु, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद,
१०) सर्व विभागीय आयुक्त,
११) सर्व जिल्हाधिकारी,
१२) कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
१३) संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, सिडको, एन-१२, सेक्टर, औरंगाबाद-४३१ ००३,
१४) संचालक, सैनिक कल्याण विभाग, "रायगड"राष्ट्रीय युध्दस्मारका समो, घोरपडी, पुणे-४११ ००१,
१५) सर्व कोषागार अधिकारी,
१६) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
१८) सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासान भवन, मुंबई ४०० ०३२,
१९) महासंचालक, माहिती व जानसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
२०) वित्त विभाग (व्यय ४), अर्थ-१३ मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
२१) शालेय शिक्षण विभाग (माध्यमिक शिक्षण-५), मंत्रालय, मुंबई-३२.
२२) सामान्य प्रशासन विभाग (कार्या २५), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
२३) निवड नस्ती (२ प्रती).